71\C:MCT 0901- 117 - tra-5.lwp

मुंबई येथे तीन अतिरिक्त मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाची स्थापना करण्याबाबत

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्र.एमसीटी ०९०१/११६५/सीआर-११७ (ब)/परि-५,
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक : २ डिसेंबर, २००३

**वाचा :-** १) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.ए-१२१७/२००१, दि. २९.७.२००३ व क्र.ए.४६०५/२००३, दि. ८.९.२००३

२) शासन अधिसूचना, गृह विभाग क्र.एमसीटी ०९०१/११६५/सीआर-११७ (ब)/परि-५, दि. २.१२.२००३

**प्रस्तावना** :- महाराष्ट्र राज्यात मोटार वाहनांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. राज्यातील वाढत्या मोटार वाहनांमुळे अपघाताचे प्रमाणही वाढत आहे. तथापि, त्या प्रमाणात अपघातात बळी पडलेल्या व्यक्तींच्या कुटूंबांचे किंवा जखमी झालेल्या अपघातग्रस्तांना न्याय देण्याच्या दृष्टीने मोटार अपघाताची न्यायाधिकरणे स्थापन न झाल्यामुळे अपघातग्रस्तांच्या नुकसान भरपाईच्या खटल्यांचे प्रमाण राज्यात वाढले आहे. सध्या मुंबईत ५ मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे कार्यरत आहेत. मुंबई येथे ३ अतिरिक्त मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे स्थापण्याचा व त्यासाठी आवश्यक पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- मोटार वाहन अधिनियम १९८८ च्या कलम १६५ (१) मधील तरतुदीतील राज्य शासनास असलेल्या अधिकारानुसार शासन अधिसूचना गृह विभाग क्र. एमसीटी- ०९०१/११६५/ सीआर-११७(ब)/परि-५, दि.२.१२.२००३ अन्वये मुंबई येथे तीन अतिरिक्त मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे स्थापन करणेस मंजूरी देणेत आली आहे. सदर न्यायाधिकरणासाठी खालीलप्रमाणे पदे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या वेतन श्रेणीमध्ये त्या अनुषंगिक वेतन व भत्त्यासह प्रथमतः २९.२.२००४ पर्यंत निर्माण करण्यास तसेच सदर न्यायाधिकरणासाठी आवश्यक फर्निचर शासन मान्यताप्राप्त संस्थांकडून विहित मार्गाने खरेदी करण्यास शासन मान्यता देत आहे. नवीन निर्माण करण्यात आलेली सदरची पदे भरताना प्रथमतः अतिरिक्त संवर्गात उपलब्ध असलेल्या कर्मचा-यांचा विचार करण्यात यावा.

| अ.क्र. | पदनाम | आवश्यक पदे | पदाची वेतनश्रेणी (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | सदस्य | ३ | १६४००-४५०-२०९०० |
| २ | उच्चश्रेणी लघुलेखक | ३ | ६५००-२००-१०५०० |
| ३ | शिरस्तेदार (अधिक्षक) | ३ | ५५००-१७५-९००० |
| ४ | बेलीफ (लिपीक) | ३ | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| ५ | शिपाई | ३ | २५५०-५५-२६६०-६०-३२०० |
| ६ | हवालदार | ३ | २५५०-५५-२६६०-६०-३२०० |

२. उपरोक्त १८ पदांच्या वेतन व भत्त्यापोटी डिसेंबर २००३ साठी २,५५,०६३/- (रु.दोन लाख पंचावन्न हजार त्रेसष्ठ फक्त) चा आवर्ती खर्च तसेच फर्निचर खरेदीसाठी होणारा रु.६,७०,१२०/- (रु.सहा लाख सत्तर हजार एकशे वीस फक्त) चा अनावर्ती खर्च मागणी क्र.बी-३, "२०४१, वाहनांवरील कर, ८००-इतर खर्च (००)(०१) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो शासन ज्ञापन, वित्त विभाग क्र.आकनि-११०२/०२/ अर्थसंकल्प-१०, अन्वये आकस्मिकता निधि मधून मंजूर करण्यात आलेल्या ९,२५,१८३/- (रु.नऊ लाख पंचवीस हजार एकशे त्र्याऐंशी फक्त) अग्रिमातून भागविण्यात यावा. या अग्रिमाची प्रतिपूर्ती विधिमंडळाच्या २००३-२००४ च्या हिवाळी अधिवेशनात संपूर्ण रकमेच्या रु.१४,३५,३०९/- (रु.चौदा लाख पस्तीस हजार तीनशे नऊ) च्या पुरवणी मागणीद्वारे करण्यात येईल.

३. सदरहू रक्कम कोषागारातून काढून खर्च करण्यासाठी अध्यक्ष , मोटार अपघात दावा न्यायाधिकरण आणि पिठासन अधिकारी, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी वरील मंजूरी प्रमाणे सदर रक्कम खर्च करण्यासाठी देयके सादर करण्यासंदर्भात पुढील सूचना काटेकोरपणे पाळाव्यात.

१) अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई पिठासन अधिकारी, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आकस्मिकता निधिमधून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे सदर रक्कम सपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात/पत्रात सदरहू आगाऊ रकमेतून खर्च करताना करण्यात येणाऱ्या देयकांवर आकस्मिकता निधि अग्रीम शासन ज्ञापन, वित्त विभाग क्र.आकनि ११०३/१०४/अर्थसंकल्प-१०, संगणक सांकेतांक ८०००-१०४-८ अन्वये मंजूर झाले आहे असे लाल शाईने लिहावे, अशी स्पष्ट सूचना या आदेशात/पत्रात अंतर्भूत करण्यात यावी व ही सूचना लाल शाईने अधोरेखीत करावी. मंजूर करण्यात आलेल्या अग्रिमाचा संपूर्ण विनियोग दि.३१.१२.२००३ पूर्वी करण्यात यावा.

२) आकस्मिकता निधी अग्रीम रकमेतून खर्च करण्यासाठी वेगळी देयके सादर करावीत.

३) शासन परिपत्रक क्र.सीएनएफ १०९३/१४०/अर्थसंकल्प-३, दि.२६.४.१९८३ व क्र.सीएनएफ-१०९३/१५३/अर्थसंकल्प-२, दि.२८.८.१९८६ अन्वये आकस्मिकता निधीमधील आगाऊ रकमेबाबत दिलेल्या आदेशाचे काटेकोरपणे पालन करावे.

४) आकस्मिकता निधी अग्रिमातून करावयाच्या खर्चासंबंधी देयके काढताना (८०००-१०४-८) संगणक संकेतांकाचा वापर करावा. देयकांवर जोडलेल्या संगणकावरील अर्थसंकल्प शीर्षाचा कोड नंबर लिहिण्यात यावा.

५) अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई पिठासन अधिकारी, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना वरील मंजूरीप्रमाणे आकस्मिकता निधितून अग्रीम रक्कम खर्च करताना ज्या कारणासाठी तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे त्याच कारणासाठी पूर्णपणे खर्च करावी. याकरीता ते पूर्णपणे जबाबदार राहतील. तसेच सदरहू रक्कम प्रत्यक्ष खर्च केल्याची माहिती त्यांनी शासनास दि.२०.१२.२००३ पूर्वी अवगत करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर ११५७/२००३/व्यय-८, दि.१७.११.२००३ अन्वये निर्गमित करणेत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

आ.बा. डमाळे

( आ. बा. डमाळे )

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिलेट साईड), मुंबई (पत्राने)
प्रोथोनोटरी आणि सिनीयर मास्टर, उच्च न्यायालय,मुंबई (पत्राने)
महासंचालक आणि पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,
परिवहन आयुक्त, मुंबई,
जिल्हाधिकारी, बृहन्मुंबई
जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई,
अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई आणि पिठासन अधिकारी, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई आणि पिठासन अधिकारी, राज्य परिवहन अपील न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा, महाराष्ट्र - १, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई (२ प्रती)
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग ( व्यय -८/वित्तीय सुधारणा/अर्थसंकल्प -१९), मंत्रालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-४००० ०३२,
गृह विभाग ( कार्यासन--बीयुडी - १), मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती.